**प्रशासकीय मान्यता**

अधिष्ठाता, ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई यांच्या अधिपत्याखाली असलेले आरोग्य पथक, पालघर, जिल्हा पालघर येथील वैद्यकीय प्रशिक्षणार्थी इमारतीचे सर्व विद्युत कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : एचयुपी-२०१९/प्र.क्र.६४/प्रशा-१

गो.ते.रुग्णालय आवार,नविन मंत्रालय, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २२ जानेवारी, २०२०

**वाचा** : संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं / आरोग्य पथक / पालघर / विद्युतीकरण / ३५०७/ प (आय) / १९ / १५३०, दिनांक ३१.०१.२०१९

**शासन निर्णय** :

ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय मुंबई यांच्या अधिपत्याखाली असलेले आरोग्य पथक, पालघर येथील वैद्यकीय प्रशिक्षणार्थी इमारतीचे सर्व विद्युत कामास रुपये २२,२६,९२१/- (रुपये बावीस लक्ष सव्वीस हजार नऊशे एकवीस फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

२. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

३. कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक- २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११/०४/२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील संबंधीत बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. निधीची तरतूद झाल्यानंतर सदर काम हे खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षातंर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. हा शासन निर्णय ,वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-३, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३९/इमा-३, दिनांक १८.०९.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२२११०७२३७३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHARRAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.22 13:32:36 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३) अधिष्ठाता, ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई (इमारत-२/३) मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,पालघर, जि.पालघर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती ( प्रशा-१)